**श्री.कुलराज सिंह, भावसे, यांना बँकॉक, थायलंड येथे आयोजित कार्यशाळेस उपस्थित राहण्यास परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक- आयएफएस-५०१९/प्र.क्र.१७५/फ-७अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक- ११ डिसेंबर, २०१९

संदर्भ :- १. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),नागपूर यांचे पत्र क्रं..कक्ष-९/ भावसे/ वैन/प्र.क्र.२८/१६-१७/२३०५/१९-२० दि. ६/११/२०१९

२. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, परदौ-१४१४/प्र.क्र.४६/११ दिनांक २९ डिसेंबर २०१४

३. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, परदौ-१४१६/प्र.क्र.११/११ दिनांक २ जून २०१६

**प्रस्तावना:-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर यांच्या कार्यालयाकडून "Integrated Habitat Conservation and Eco -development in Vidarbha Tiger Landscape " हा प्रकल्प १२ स्वयंसेवी संस्था (एनजीओ) यांचे सहकार्याने राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पाकरीता International Union for Conservation of Nature (IUCN), हे प्रायोजक असून त्यांचे मार्फत डिसेंबर २०१६ ते डिसेंबर २०१९ या कालावधीमध्ये अर्थसहाय्य मिळाले आहे.

२. International Union for Conservation of Nature (IUCN), यांचेमार्फत सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने वन्यजीव विषयाशी संबंधित जागतिक स्तरावर कार्यशाळा आयोजित करण्यात येत असून अशीच एक कार्यशाळा "Human-Wildlife Conflict Management and Coexistence" या विषयावर बँकॉक, थायलंड येथे दिनांक १९/११/२०१९ ते दिनांक २२/११/२०१९ या कालावधीत त्यांचेकडून कार्यशाळा आयोजित करण्यात आली असल्याने भारतीय वनसेवेतील अधिकाऱ्यांस सदर कार्यशाळेस नामनिर्देशित करण्याबाबत Head, IUCN, Asia Regional Office यांचेकडून कळविण्यात आले होते. त्यानूसार भारतीय वनसेवेतील अधिकाऱ्यांस नामनिर्देशित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

Head, International Union for Conservation of Nature (IUCN), Asia Regional Office यांनी दि. १६/११/२०१९ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार श्री.कुलराज सिंह, भावसे, उपवनसंरक्षक, ब्रम्हपुरी वनविभाग ब्रम्हपुरी यांना "Human-Wildlife Conflict Management and Coexistence" या विषयावर दिनांक १८/११/२०१९ ते दिनांक २४/११/२०१९ या कालावधीत (प्रवासाच्या कालावधीसह) बँकॉक, थायलंड येथे होणाऱ्या कार्यशाळेकरीता उपस्थित राहण्यासाठी या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर दौऱ्याकरीता येणारा संपूर्ण खर्च (देशांतर्गत प्रवास खर्च वगळता) “Integrated Habitat Conservation and Eco -development in Vidarbha Tiger Landscape ” प्रकल्पाकरीता प्रायोजक असलेले International Union for Conservation of Nature (IUCN), यांचेकडून करण्यात येणार आहे. सदर दौऱ्यास सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २९/१२/२०१४ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनूसार मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील शिफारस समितीची तसेच मा. राज्यपाल महोदयांची मान्यता घेण्यात आलेली आहे. त्याचप्रमाणे सदरच्या विदेश दौऱ्यास केंद्र शासनाच्या Ministry of Home Affairs, Government of India यांच्या दिनांक २१/११/२०१९ आणि Ministry of External Affairs, Government of India यांच्या दिनांक ४/१२/२०१९ रोजीच्या ईमेलव्दारे ना हरकत (FCRA,2010) व (Political Clearance) प्राप्त झालेला आहे.

३. श्री.कुलराज सिंह, भावसे यांचा उपरोक्त विदेश दौऱ्याचा कालावधी प्रतिनियुक्ती/कर्तव्य कालावधी म्हणून धरण्यात यावा. तसेच, त्यांना सदर दौऱ्याकरीता शासकीय नियमाप्रमाणे भत्ते (per diem) अनुज्ञेय असतील. श्री.कुलराज सिंह, भावसे यांनी कार्यशाळेवरुन परत आल्यावर त्यांच्या सदर कार्यशाळेसंबंधी विस्तृत अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१२१११७१४२८१८१९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.12.11 17:24:31 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
८. श्री.कुलराज सिंह, भावसे, उपवनसंरक्षक, ब्रम्हपुरी वनविभाग ब्रम्हपुरी
९. उपसचिव (कार्यासन ११),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सहायक संचालक, भावसे/लेखा, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती, कार्यासन फ-७.